**सर ज. जी. कला महाविद्यालय , सर ज.जी उपयोजित कला महाविद्यालय आणि सर ज.जी वास्तुशास्त्र महाविद्यालय या तीन महाविद्यालयांचे मिळून राज्यस्तरीय विद्यापीठ स्थापन करण्यासंदर्भात अहवाल सादर करण्यासाठी अभ्यास समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एडीआर-२०२१/प्र.क्र. ६८/तांशि-६,**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक: २१ मार्च, २०२२

**प्रस्तावना :-**

सर ज.जी. कला महाविद्यालय, सर ज.जी.उपयोजित कला महाविद्यालय आणि सर ज.जी. वास्तुशास्त्र महाविद्यालय या तीन महाविद्यालयांना कलेचा प्रदीर्घ वारसा लाभला आहे. कला आणि वास्तुशास्त्र शिक्षण क्षेत्रातीत सदर संस्थांचे स्थान अग्रगण्य आहे. उपरोक्त बाबी विचारात घेऊन सर ज.जी. कला महाविद्यालय, सर ज.जी.उपयोजित कला महाविद्यालय आणि सर ज.जी. वास्तुशास्त्र महाविद्यालय या तीन महाविद्यालयांचे मिळून राज्यस्तरीय विद्यापीठ स्थापन करण्याचा शासनाचा मानस आहे. त्या अनुषंगाने मा. मंत्री (उच्च व तंत्रशिक्षण) यांनी निर्देशित केल्यानुसार राज्यस्तरीय विद्यापीठ स्थापनेसंदर्भातील सर्व बाबींचा सविस्तर अभ्यास करून शासनास अहवाल सादर करण्यासाठी अभ्यास समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय:-**

सर ज.जी. कला महाविद्यालय, सर ज.जी.उपयोजित कला महाविद्यालय आणि सर ज.जी. वास्तुशास्त्र महाविद्यालय या तीन महाविद्यालयांचे मिळून राज्यस्तरीय विद्यापीठ स्थापन करण्यासंदर्भात अभ्यास करून शासनास अहवाल सादर करण्यासाठी खालीलप्रमाणे अभ्यास समिती गठित करण्यात येत आहे...

| क्र. | नाव | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १. | श्री.विजय खोले, माजी कुलगुरू, मुंबई विद्यापीठ, मुंबई | अध्यक्ष |
| २. | श्री.रवींद्र कुलकर्णी, प्र कुलगुरू, मुंबई विद्यापीठ, मुंबई | सदस्य |
| ३ | श्री.नरेश चंद्रा, माजी प्र कुलगुरू, मुंबई विद्यापीठ, मुंबई | सदस्य |
| ४. | श्री.शशी प्रभू, वास्तुकला तज्ञ, वानखेडे स्टेडियम, ब्लॉक क्र. ए२-बी१, नॉर्थ स्टँड,चर्चगेट, मुंबई ४०० ०२०. | सदस्य |
| ५. | श्री.सुहास बहुलकर, चित्रकार, शिवानंद सोसायटी, चित्रकार केतकर मार्ग, विलेपार्ले (पू), मुंबई ४०० ०५७. | सदस्य |
| ६. | श्री.शे.व.चिंधडे, सेवानिवृत्त उप सचिव, विधि व न्याय विभाग | सदस्य |
| ७. | श्री. विजय राजेशिर्के, सावर्डा, जि. रत्नागिरी | सदस्य |
| ८. | श्री.राजीव मिश्रा, संचालक, कला संचालनालय | सदस्य सचिव |

संबंधित क्षेत्रातील विषय तज्ज्ञांना आवश्यकतेनुसार, समितीमध्ये निमंत्रित सदस्य म्हणून समाविष्ट करण्याचे अधिकार उपरोक्त अभ्यास समितीच्या अध्यक्षांना राहतील.

०२. उपरोक्त अभ्यास समितीने राज्यस्तरीय विद्यापीठ स्थापन करण्याच्या अनुषंगाने खालील बाबींसंदर्भात अभ्यास करून शासनास अहवाल सादर करावा.

(१) वैधानिक संरचना
(२) पायाभूत सुविधांची निर्मिती
(३) विद्यापीठांतर्गत चालविण्यात येणारे अभ्यासक्रम निश्चित करणे
(४) विद्यापीठासाठी विविध प्राधिकरणे स्थापन करणे
(५) सांविधानिक व इतर पदांची संरचना व निर्मिती
(६) शिक्षक व शिक्षकेतर पदांची संरचना व निर्मिती
(७) प्रशासकीय पदांची संरचना व निर्मिती
(८) आर्थिक उत्पन्नाचे स्त्रोत व वित्त पुरवठा
(९) शासनावर येणाऱ्या अतिरिक्त आर्थिक भाराची परिगणना करणे

०३. सर ज.जी. कला महाविद्यालय, सर ज.जी.उपयोजित कला महाविद्यालय आणि सर ज.जी. वास्तुशास्त्र महाविद्यालय या तीन महाविद्यालयांचे मिळून राज्यस्तरीय विद्यापीठ स्थापन करण्यासंदर्भातील सर्व बाबींचा अभ्यास करून समितीने आपला अहवाल शासनास तीस दिवसांच्या आत शासनास सादर करावा.

०४. अभ्यास समितीच्या बैठकांचे आयोजन, संचालक, कला संचालनालय तथा सदस्य सचिव, अभ्यास समिती यांनी करावे. तसेच, समिती सदस्यांना बैठक भत्ता आणि प्रवास भत्ता यांचे प्रदान करण्याची कार्यवाही देखील संचालक, कला संचालनालय यांनी करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०३२११७१२११०६०८ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Jagdeorao Tidke

Digitally signed by Satish Jagdeorao Tidke
DN: CN = Satish Jagdeorao Tidke, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Higher And Technical Education Department
Date: 2022.03.22 17:12:50 +05'30'

**(सतिश तिडके)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

५) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई

६) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई.

७) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

८) श्री.विजय खोले, माजी कुलगुरू, मुंबई विद्यापीठ, मुंबई

९) श्री.रवींद्र कुलकर्णी, प्र कुलगुरू, मुंबई विद्यापीठ, मुंबई

१०) श्री.नरेश चंद्रा, माजी प्र. कुलगुरू, मुंबई विद्यापीठ, मुंबई

११) श्री.शशी प्रभू, वास्तुकला तज्ञ, वानखेडे स्टेडियम, ब्लॉक क्र. ए २-बी१, नॉर्थ स्टँड,चर्चगेट, मुंबई ४०० ०२०.

१२) श्री.सुहास बहुलकर, चित्रकार, शिवानंद सोसायटी, चित्रकार केतकर मार्ग, विलेपार्ले (पू), मुंबई ४०० ०५७.

१३) श्री.शे.व.चिंधडे, सेवानिवृत्त उप सचिव, विधि व न्याय विभाग. मंत्रालय, मुंबई

१४) श्री. विजय राजेशिर्के, सावर्डा,,जि. रत्नागिरी.

१५) श्री.राजीव मिश्रा, संचालक, कला संचालनालय, मुंबई

१६) निवड नस्ती (ताशि-६), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.